**सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष) यांच्या कार्यालयातील पदांचा सुधारित आकृतीबंध विहित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२२/प्र.क्र.७७/१६-ब(बी)**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: २१ जून, २०२३

वाचा: १) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक:बीसीसी-१०८५/२९८८/१६-ब, दि.१३.०८.१९८६
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.:बीसीसी-१०८८/१९१९/१६-ब, दि.११.०५.१९९०
३) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक:बीसीसी-१३९४/प्र.क्र.२५/९४/१६-ब, दि.२४.११.२०००
४) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.:असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०.०९.२००१
५) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक:अर्थसं-२००३/प्र.क्र.११५/०३/१६-ब, दि.१९.०७.२००४
६) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक:बीसीसी-२००५/प्र.क्र.२/०५/१६-ब, दि.१६.०३.२००६
७) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.:पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दि.११.०२.२०१६
८) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.:पदनि-०६१७/प्र.क्र.२०/आ.पु.क., दि.०९.०६.२०१७
९) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक:बीसीसी-२०१८/प्र.क्र.२८९अे/१६-ब, दि.१३.०९.२०१९

**प्रस्तावना:**

सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष), विभागीय आयुक्त कार्यालये, महाराष्ट्र राज्य या कार्यालयांतील एकूण ४६ पदांना संदर्भ क्र.६ अन्वये यापूर्वी मान्यता देण्यात आली होती. वित्त विभाग, शासन निर्णय, दि.१०.०९.२००१ अन्वये राज्य शासनाच्या अखत्यारितील सर्व शासकीय कार्यालयांतील पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याबाबत विहित केलेल्या धोरणानुसार बहुतांश प्रशासकीय विभाग व त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयांनी सुधारित आकृतीबंध निश्चित केला नसल्याचे निदर्शनास आल्यामुळे वित्त विभागाने मा. मुख्य सचिवांच्या निदेशानुसार दि. ११.०२.२०१६ रोजी सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याबाबत शासन निर्णय निर्गमित केला आहे. त्यानुसार सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष) या कार्यालयांतील पदांचा सुधारित आकृतीबंध विहित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविल्यानुसार सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष) या कार्यालयातील अ.क्र.१ ते ४ येथे नमूद संवर्गातील नियमित पदे व अ.क्र.५ व ६ येथे नमूद संवर्गातील बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाचे एकूण १२ मनुष्यबळ याबाबतच्या सुधारित आकृतीबंधास वित्त विभाग, शासन निर्णय, दि.११.०२.२०१६ अन्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय सचिव समितीने दि.२९.०४.२०२२ रोजीच्या बैठकीत मान्यता दिली आहे. त्यानुसार सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष) या कार्यालयातील परिशिष्ट "अ" नुसार एकूण ३६ नियमित पदे व परिशिष्ट "ब" नुसार बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाचे १२ मनुष्यबळ अशा सुधारित आकृतीबंधास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. परिशिष्ट “अ” येथील तक्त्यात दर्शविल्यानुसार वाहनचालक व शिपाई हे संवर्ग मृत घोषित करण्यात आले आहेत. त्यापैकी वाहनचालक संवर्गातील १ कार्यरत पद व शिपाई संवर्गातील ६ कार्यरत पदे अशी एकूण ७ कार्यरत पदे अधिसंख्य ठरविण्यात येत आहेत. सदर अधिसंख्य पदे

त्यावरील कार्यरत कर्मचाऱ्यांच्या स्वेच्छा सेवानिवृत्ती/सेवानिवृत्ती/राजीनामा/मृत्यू इ. कारणांमुळे रिक्त झाल्यानंतर आपोआप निरसित होतील.

३. तसेच वाहनचालक व शिपाई या संवर्गांकरिता मनुष्यबळाच्या मर्यादेत (सध्या अधिसंख्य पदावर कार्यरत असलेली पदे वगळून) बाह्ययंत्रणेकडून गरजेनुसार सेवा उपलब्ध करुन घेण्यात याव्यात. सदर संवर्गातील अधिसंख्य पदे निरसित झाल्यानंतर या सेवा बाह्ययंत्रणेमार्फत गरजेनुसार उपलब्ध करुन घेण्यात याव्यात.

४. उपरोक्त नमूद ३६ नियमित पदे व बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाचे १२ मनुष्यबळ यांच्या वेतन व भत्त्यावर येणारा खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.ए-०४, मुख्य लेखा शीर्ष "२०७० इतर प्रशासनिक सेवा-८०० इतर खर्च (००)(०६) विभागीय आयुक्तांची कार्यालये-मागासवर्ग कक्ष (२०७० ०५८६)" या लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.२९.०४.२०२२ रोजी झालेल्या सन २०२२ मधील दुसऱ्या बैठकीत दिलेल्या मान्यतेने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२/आपुक, दि.१८.०१.२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक क्रमांक २०२३०६२११७४०५४६५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDAM EKNATH ANDHALE

Digitally signed by SUDAM EKNATH ANDHALE
DN: CN = SUDAM EKNATH ANDHALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2023.06.22 11:34:43 +05'30'

**( सु. ए. आंधळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**सहपत्र : परिशिष्ट-अ व ब**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य १, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य २, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य १, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य २, नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. सर्व सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष)
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. वित्त विभाग, अर्थसंकल्प १३, १९ व व्यय-४, मंत्रालय, मुंबई
९. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (आस्थापना), मंत्रालय, मुंबई
१०. उप सचिव, महसूल व वन विभाग (आस्थापना), मंत्रालय, मुंबई
११. सामान्य प्रशासन विभाग (कार्या.२५), मंत्रालय, मुंबई
१२. निवडनस्ती /कार्या.१६ब.

**शासन निर्णय क्रमांक:संकीर्ण-२०२२/प्र.क्र.७७/१६-ब(बी), दि. २१ जून, २०२३ सोबतचे जोडपत्र**

**परिशिष्ट -"अ"**

| अ.क्र. | पदनाम | वेतनसंरचना | सध्या मंजूर पदे | कार्यरत पदे | रिक्त पदे | सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर पदे |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | सहायक आयुक्त | एस-२०, ५६१००-१७७५०० | ६ | ६ | ० | ६ |
| २ | नायब तहसिलदार | एस-१४, ३८६००-१२२८०० | ६ | ६ | ० | ६ |
| ३ | अव्वल कारकून | एस-१२, ३२०००-१०१६०० | १२ | ११ | १ | १२ |
| ४ | लिपिक टंकलेखक | एस-६, १९९००-६३२०० | १२ | ११ | १ | १२ |
| ५ | वाहन चालक (मृत संवर्ग) | एस-६, १९९००-६३२०० | ४+२ (२ काल्पनिक पदे बाह्ययंत्रणेद्वारे) | ४+१ (१ बाह्ययंत्रणेद्वारे) | १ (काल्पनिक पद) | ० |
| ६ | शिपाई (मृत संवर्ग) | एस-१, १५०००-४७६०० | ६ | ४ | २ | ० |
| | एकूण | | ४६ नियमित (+२ काल्पनिक पदे बाह्ययंत्रणेद्वारे) | ४२+१ (१ बाह्ययंत्रणेद्वारे) | ४+१ (१ काल्पनिक पद) | एकूण ३६ नियमित पदे |

**परिशिष्ट "ब"**
**(बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाचे मनुष्यबळ)**

| अ.क्र. | पदनाम | संवर्ग | सुधारित आकृतीबंधानुसार मंजूर बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाचे मनुष्यबळ |
|---|---|---|---|
| १ | वाहन चालक | गट क | ६ |
| २ | शिपाई | गट ड | ६ |
| | एकूण | -- | १२ |

SUDAM EKNATH ANDHALE

Digitally signed by SUDAM EKNATH ANDHALE
DN: CN = SUDAM EKNATH ANDHALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2023.06.22 11:34:56 +05'30'

**( सु. ए. आंधळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन